कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असतांना कोव्हिड-१९ विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचा-यांच्या कुटूंबियांना सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत..
दिवंगत मिलिंद गरीबा पेंदाम, महसूल सहाय्यक

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन ज्ञापन क्र.अनुदान-२०२१/प्र.क्र.२८६/ई-७**
मंत्रालय (मुख्य इमारत), पहिला मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई- ४०० ०३२
**दिनांक:- २५ मार्च, २०२२.**

**संदर्भ :-** १) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दि.२९.०५.२०२० व दि.१४.१०.२०२०
२) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे क्र: मशा-७(१)/आस्था-२/प्र.क्र.१९/२१/कावि-१०५२/२०२१, दिनांक ०१ ऑक्टोबर, २०२१.

**शासन ज्ञापन :-**

संदर्भांकित क्रमांक १ येथील वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक २९ मे, २०२० अन्वये कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावतांना कोव्हिड-१९ विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू होणा-या कर्मचा-यांना विमा कवच/ सानुग्रह सहाय्य लागू करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे.

२. जिल्हाधिकारी कार्यालय, चंद्रपूर यांच्या आस्थापनेवर कार्यरत असलेले कर्मचारी दिवंगत मिलिंद गरीबा पेंदाम, महसूल सहाय्यक यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य पार पाडतांना कोरोना विषाणू संसर्गाने दि.१३.०६.२०२१ रोजी मृत्यू झाला आहे.

३. दिवंगत मिलिंद गरीबा पेंदाम, महसूल सहाय्यक यांच्या कुटूंबियांना शासन निर्णय, वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२० अनुसार रु.५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रक्कमेच्या सानुग्रह सहाय्य मंजूरीचा जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांचा प्रस्ताव विभागीय आयुक्त, नागपूर यांनी संदर्भाधीन क्रमांक २ येथील पत्रान्वये सादर केला आहे.

४. उक्त महसूल सहाय्यक हे "कोव्हिड-१९" च्या सार्वत्रिक साथीच्या अनुषंगाने "प्रतिबंध" करण्याचे कर्तव्य बजावत होते आणि ते मृत्यूच्या दिनांकापूर्वी १४ दिवसांच्या काळात कर्तव्यावर हजर होते असे, जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांनी प्रमाणित केले आहे.

५. तसेच, दिवंगत मिलिंद गरीबा पेंदाम, महसूल सहाय्यक यांचा मृत्यू हा "कोव्हिड-१९" या विषाणूशी संबंधित आहे, असे संबंधित सरकारी / महानगरपालिका / I.C.M.R प्राधिकृत खाजगी रुग्णालय / प्रयोगशाळा यांच्या अहवालात नमूद करण्यात आले आहे.

६. त्यानुसार, जिल्हाधिकारी कार्यालय चंद्रपूर यांच्या आस्थापनेवर कार्यरत कर्मचारी दिवंगत मिलिंद गरीबा पेंदाम, महसूल सहाय्यक यांच्या कुटूंबियांना रु.५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतकी रक्कम सानुग्रह सहाय्य म्हणून प्रदान करण्यास याव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

७. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च खाली नमूद लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.
"मागणी क्र. सी-१, २०५३ जिल्हा प्रशासन, ९३- जिल्हा आस्थापना, (०१) (०५) विभागीय आयुक्त,नागपूर, (अनिवार्य) २०५३ ०१०८, या लेखाशिर्षाखालील १३- कार्यालयीन खर्च"

८. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२२०३२५१३१९४१९२१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SANJAY BANKAR

Digitally signed by SANJAY BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, pseudonym=B37546F6A6BD466ED45270ED708F924F51A07EA8, serialNumber=C5917E56B0DA516AB259D846D516CB0584DCE5E9A2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY BANKAR
Date: 2022.03.25 13:20:36 +05'30'

**(संजय बनकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) विभागीय आयुक्त, नागपूर.
४) प्रधान महालेखापाल (लेखा व हकदारी / लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
५) महालेखापाल (लेखा व हकदारी / लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
६) जिल्हाधिकारी, चंद्रपूर.
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर.
१०) कार्यासन अधिकारी (व्यय-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) दिवंगत मिलिंद गरीबा पेंदाम, महसूल सहाय्यक यांचे कुटूंबिय (जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांचेमार्फत)
१२) निवडनस्ती (कार्यासन ई-७)